राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान २.० (RUSA) या योजनेअंतर्गत शासकीय मॉडेल डिग्री कॉलेज, नंदुरबार येथील वसतिगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकिय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. रुसायो-२०१८/प्र.क्र. ३५० (भाग-१) /विशि-३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १२ डिसेंबर, २०१८

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्र. रुसायो-२०१३/प्र.क्र.४१८/वि.शि.-३ दि. २० मे, २०१५

२) मानव संसाधन विकास, मंत्रालयाच्या प्रकल्प मंजूरी मंडळाच्या (Project Approval Board) दि. २५ मे, २०१८

३) जिल्हाधिकारी कार्यालय वाशिम यांचे पत्र क्र. कक्ष-४/क.लि.-२(महसूल)/ कवि ४४२ /२०१८, दि.९ जुलै,२०१८.

४) जिल्हाधिकारी कार्यालय नंदुबार यांचे पत्र क्र. २०१८/ब/कक्ष-२/गांवठाण/ कावि/ ६४८, दि. ९ जुलै, २०१८.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौप.सं.क्र.३३८/इमा-३, दि. ३०.११.२०१८.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यात उच्च शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी, समानता यासाठी केंद्र शासनाने तयार केलेल्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाच्या अंमलबजावणीबाबत दि. २१/०४/२०१५ रोजी मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आलेला आहे. राज्य मंत्री मंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने ही योजना राज्यात प्रभावीपणे राबविण्यासाठी दि. २० मे, २०१५ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाच्या मनुष्यबळ विकास मंत्रालयाने राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान २.० अंतर्गत १४ घटकांची निर्मिती केली आहे. या १४ घटकामध्ये घटक क्र. ५ अंतर्गत “नवीन शासकीय मॉडेल डिग्री कॉलेज” या घटकाचा समावेश आहे. याकरिता निती आयोगाने देशभरात ७० महत्वाकांक्षी जिल्ह्यांची (Aspirational Districts) निवड केली आहे.यामध्ये महाराष्ट्रातील नंदुरबार व वाशिम या दोन जिल्ह्यांची निवड करण्यात आली आहे.

जिल्ह्यातील स्थुल नोंदणी प्रमाण (Gross Enrollment Ratio), मुलींची संख्या व मागासवर्गीयांच्या लोकसंख्येचे प्रमाण या निकषावर त्या जिल्ह्यात शिक्षणाच्या सुविधा उपलब्ध व्हाव्यात म्हणून मानव संसाधन विकास, मंत्रालयाच्या प्रकल्प मंजूरी मंडळाच्या (Project Approval Board) दि. २५ मे, २०१८ रोजी झालेल्या १२ व्या बैठकीत महाराष्ट्रातील नंदुरबार व वाशिम या दोन जिल्हांमध्ये नवीन शासकीय मॉडेल डिग्री कॉलेज स्थापन करण्यासाठी मंजूरी देण्यात आली आहे.

सदर योजनेंतर्गत शासकीय मॉडेल डिग्री कॉलेज स्थापनेकरिता रु. १२००.०० लक्ष अनावर्ती खर्चासाठी अनुदान मंजूर झाले आहे. सदर योजना केंद्र व राज्य शासन ६०:४० या प्रमाणात असल्याने केंद्र व राज्य हिस्सा अनुक्रमे रु. ७२०.०० लक्ष व रु. ४८०.०० लक्ष असेल.

सदर मॉडेल डिग्री कॉलेज स्थापनेकरिता ज्या पुर्वअटी आहेत त्यानुसार नंदुरबार येथील प्रस्तावित मॉडेल डिग्री महाविद्यालयाकरिता जिल्हाधिकारी, नंदुरबार यांनी मौजे टोकरतळे येथील गट क्रमांक ६५/१ अ मधील ४.०० हे. आर जमिन उपलब्ध करुन दिली असुन सदर जमिन उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या नावे करण्यात आलेली आहे.

सावर्जनिक बांधकाम विभागाने शासकीय मॉडेल डिग्री महाविद्यालय, नंदुरबार येथील वसतिगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकांची तांत्रिक छाननी करुन सहमती दर्शविली आहे.

त्यानुसार नंदुरबार जिल्हांमध्ये नवीन शासकीय मॉडेल डिग्री महाविद्यालयकरिता वसतिगृह इमारत बांधकामास प्रशासकिय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय मॉडेल डिग्री महाविद्यालय, नंदुरबार येथील वसतिगृह इमारत बांधकामाच्या रु. ६२६.१९ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे.

I. प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पुर्व परवानगी घ्यावी.

II. तांत्रिक मंजुरी देताना राज्य दरसुचीबाह्य बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्र. २०१७/प्र.क्र. ११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

III. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, उर्जा व कामगार विभागाकडील दि. २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सुचना विचारात घ्याव्यात.

IV. प्रत्यक्ष कामकरते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

V. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणांबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

VI. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सुचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

VII. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकिय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही या दृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. शासकीय मॉडेल डिग्री महाविद्यालय, नंदुरबार येथील वसतिगृह इमारतीचे बांधकाम सावर्जनिक बांधकाम विभागाकडुन करण्यात येईल.

३. सदर योजनेवरील खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशीर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (०७) (०१) व (०२) राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान अंतर्गत शासकीय संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा) (२२०२ आय २७२), ३१ सहाय्यक अनुदाने व (केंद्र हिस्सा) (२२०२ आय २६३), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली मधील मंजूर तरतुदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१२१३१७४५१०५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2018.12.13 17:59:12 +05'30'

**( सिध्दार्थ खरात )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव.
४. प्रकल्प संचालक, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपुर.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपुर.
७. कुलगुरू/ कुलसचिव, कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
८. संचालक, उच्च शिक्षण, पुणे.
९. नियोजन विभाग ( कार्यासन १४७१ ) मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग, ( कार्यासन व्यय-५ ),मंत्रालय,मुंबई
११. सावर्जनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई.
१२. मुख्य अभियंता, सावर्जनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
१३. अधिक्षक अभियंता, सावर्जनिक बांधकाम मंडळ, धुळे.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.
१५. सहसंचालक, उच्च शिक्षण, जळगांव.
१६. सचिव (उ.व.तं.शि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. सह सचिव (विशि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. कार्यासन अधिकारी (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती.